प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता (केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा) रुपये २८,७९,२९७/- इतका निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२१/प्र.क्र. १०९ (भाग-१)/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २९ मार्च, २०२२

**वाचा:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३ डिसेंबर, २०२०
२. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रअयो-२०२१/प्र.क्र.१२०/९-अे, दि. १२ ऑक्टोबर, २०२१
३. केंद्र शासनाचे जा.क्र. FM-11/60/2021-FME, Date:17.12.2021 व जा.क्र. FM-11/60 /2021-FME-Part(2), Date:21.12.2021
४. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र.पीएमएफएमई/वित्तीयमान्य प्रस्ताव २१-२२/३५५५/२०२२, दि. ३१.०१.२०२२
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दिनांक ०३.०२.२०२२ व दिनांक १७.०३.२०२२
६. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र: बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि. २८ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

"प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना" ही "एक जिल्हा-एक उत्पादन" या धर्तीवरील केंद्र पुरस्कृत योजना उपरोक्त वाचा येथील क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी राज्यामध्ये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेमध्ये केंद्र हिस्सा ६०% तर राज्य हिस्सा ४०% असा असणार आहे. वाचा येथील क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये सदरहू योजनेची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. वाचा येथील क्रमांक ३ च्या केंद्र शासनाच्या दिनांक १७.१२.२०२१ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने बीज भांडवल आणि प्रशासकीय शुल्कापोटी तसेच दिनांक २१.१२.२०२१ च्या पत्रान्वये दुसऱ्या टप्प्यातील केंद्र हिस्सा उपलब्ध करुन दिला आहे. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन) यांच्याकडून वाचा येथील क्र. ४ च्या पत्रान्वये प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता निधी मागणीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला असून वाचा येथील क्रमांक ६ च्या दिनांक २८.०३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा असा एकूण रुपये २८,७९,२९७/-(रुपये अठ्ठावीस लाख एकोणऐंशी हजार दोनशे सत्यान्नव फक्त) इतका निधी कृषि विभागास उपलब्ध करुन दिला आहे.

सदर निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे..

**शासन निर्णय:-**

१. प्रधानमंत्री सुक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेची सन २०२१-२२ मध्ये राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रुपये १७,२७,५७८/- इतका निधी व त्यास समरुप राज्य हिस्सा रुपये ११,५१,७१९/-असा एकूण (केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा) २८,७९,२९७/-(रुपये अठ्ठावीस लाख एकोणऐंशी हजार दोनशे सत्यान्नव फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षाखालील बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. टी-०५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(४०) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३- अर्थसहाय्य (२४०१ B३५७) | मागणी क्र. टी-०५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(४१) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B३६६) |

३. सदर रक्कमेचे कोषागारातून आंहरण व संवितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर कोषागारातून आंहरण व संवितरण करण्यासाठी जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल यांची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक

उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्ह्यात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), राज्यस्तरीय तांत्रिक संस्था (SLTI) व इतर यंत्रणांकरिता जिल्हा स्तरावर अवलंबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दतीबाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

९. प्रस्तुत आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक १४.१०.२०२१ व दिनांक १७.०३.२०२२ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६, दिनांक २८ मार्च, २०२२ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१७५१२२०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BABURAO MAHADU ASOLE

Digitally signed by BABURAO MAHADU ASOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=225c6caaa4fd8ec882bd3bee9539413914b44aad4058d0b3d6d153454b385353, pseudonym=7BBE5961D0F8CD6221BA971FB46E978F56C2A676, serialNumber=7EEFD6CD19B53F91B65DAD89AA72A32B839329DB6184B40A0F533230BD96705E, cn=BABURAO MAHADU ASOLE
Date: 2022.03.29 17:52:01 +05'30'

**( बा. म. आसोले )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

३) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

४) मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

५) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.

६) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.

७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
११) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१४) संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२२) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२४) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५) निवड नस्ती/९-अे.